भाव आणि अभाव यांच्या मागून जाणाऱ्या बुद्धीचा त्याग करून निःसंग संवित्प्रकाशमय हो. केवळ शरीर, मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या योगानें कर्म करतांना अथवा न करतांना जो पुरुष निःसंग असतो तो पुण्य-पापांनीं लिप्त होत नाहीं. मनोराज्यातील वैभव नष्ट झालें किंवा पुष्ट झालें तरी दुःख व सुख जसें होत नाहीं त्याप्रमाणें संगरहित केलेल्या कर्मामुळें सुखदुःख होत नाहीं. यास्तव मतीला संगशून्य करून केवळ अंगयष्टीनें प्राप्तकार्य करीत रहा. चित्त अन्यत्र व्यासक्त ( दुसरीकडे गढून गेलेलें ) असल्यास शरीरास झालेला स्पर्श कळत नाहीं, नेत्रापुढें आलेला पदार्थ दिसत नाहीं, जवळच्या कोणी कांहीं म्हटल्यास ऐकूं येत नाहीं; हें पामरानाही स्वानुभवानेंच ठाऊक आहे. तेव्हां चित्त संगरहित झाल्यास शरीरानें घडणाऱ्या कार्याचा परिणाम त्यावर होत नाहीं हें आमचें म्हणणें किती युक्त आहे, हें कोणालाही कळण्यासारखें आहे. अर्थात् आसक्ति-पूर्वक पदार्थास पहाणें हेंच बंधाचें कारण आहे. संगच सर्व अर्थ, अनर्थ, संसार, आशा व आपत्ती यांचें कारण आहे. संगत्याग हाच मोक्ष ( वर्तमान-देह-संबंधनिवृत्ति) आहे व संगत्यागानेंच भाविदेहादि बंध निवृत्त होतो. यास्तव हे निष्पाप रामा, तूं संगत्याग करून जीवन्मुक्त हो.

**श्रीराम**—प्रभो, संग कशाला म्हणतात, तें थोडक्यांत सांगा.

**श्रीवसिष्ठ**—इष्ट पदार्थाचा संयोग व अनिष्ट पदार्थाचा वियोग झाला असतां हर्ष व इष्ट पदार्थाचा वियोग व अनिष्ट पदार्थाचा संयोग झाला असतां शोक हे दोन विकार देणारी जी मलिन वासना तिला संग असें म्हणतात. जीवन्मुक्ताची पुनर्जन्मास कारण न होणारी व हर्ष-विषादरहित वासना शुद्ध असते. देह असेपर्यंत रहाणारी ती असंग-संज्ञक वासना होय. असल्या वासनेनें जें कर्म होतें तें बद्ध करीत नाहीं. पण अजीवन्मुक्त मूढ व दीन पुरुषांची हर्ष-विषादयुक्त वासना बंध उत्पन्न करते. तिलाच संग म्हणतात, हे तुला वर सांगितलें आहे. ती पुनर्जन्म देते. तिच्या योगानें केलेलें कर्म केवळ बंधालाच कारण होतें. यास्तव चित्ताला विकारयुक्त करणाऱ्या या संगाला सोडून तूं जर निर्व्यग्र ( स्वस्थ ) रहाशील तर कोणत्याही कर्मानें लिप्त होणार नाहींस. हर्ष, क्रोध व विषाद यांच्या योगानें जर तूं वैरूप्यास प्राप्त झाला नाहींस (म्हणजे तुझ्या मुखचर्येंत व अंतःकरणांत जर फरक पडला नाहीं ) तर

तू वीतराग-भय-क्रोध व असंग आहेस, असें तुला साधू समजतील. दुःखांच्या योगानें ग्लानि व सुखाच्या योगानें हर्ष यांस प्राप्त न होता तू जर आशापारतंत्र्य सोडशील तर तत्काल निःसंग होशील. व्यवहार व सुखदुःखदशा यामध्यें विहार करीत असतांना जर तूं सत्साम्य ( ब्रह्मैक्य ) सोडले नाहींस तर असंग होशील. चित्तस्वभाव सम व यथाप्राप्त अनुवर्तन करणारा झाला कीं तू असंग झालास असें समज. हे पवित्र रामा, स्थिर जीवन्मुक्त अवस्थेचा अवलंब करून सम, स्वस्थ व विरक्त हो. कारण जीवन्मुक्तमति पुरुष मौनी, जितेंद्रिय, मान-मद-मात्सर्य-रहित, व संतापशून्य असतो. भोग व विक्षेप यांस कारण होणारा वस्तुसमूह सदा सज्ज असतानाही तो समचित्त रहातो. त्याचें सत्त्व (चित्त) आशा-याचनादि दैन्यरहित असतें. तो स्ववर्णाश्रमोचित सहज क्रमप्राप्त व्यापारावांचून अन्य कांहीं करीत नाहीं व तें प्राप्त कर्म करीत असतानाही त्याची बुद्धि आतून समगर्वादिहीन रहात असल्यामुळें त्याला खेद होत नाहीं. क्षीरसागर आपलें शुभ्रत्व जसें कधीं सोडीत नाहीं त्याप्रमाणें तो महामति कोणत्याही अनुकूल अथवा प्रतिकूल दशेंत आपला पूर्वसिद्ध शांति-दांति-प्रमाद समदर्शन इत्यादि स्वभाव सोडीत नाहीं. साम्राज्य किंवा अठरा विश्वे दारिद्र्य, कुटुंबादि सर्वयोनी किंवा दैवकृत्य यांतील कांहीं जरी प्राप्त झालें तरी तो सदा अक्लिन्न असतो. यास्तव तूंही क्रोध-शून्य, भेदरहित, व कौतुकाभाववान् होऊन मोक्षनिष्ठ होशील, असा विचार कर. वासनाक्षययुक्त शुद्ध विचारानें तें अक्षय श्रेष्ठ पद तुला दिसेल म्हणजे तू पुनरपि जन्मबंधनांनी बद्ध होणार नाहींस ९३.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत श्रीबृहद्योगवासिष्ठसाराचें पांचवें उपशम प्रकरण समाप्त झालें ५.

श्रीकृष्णार्पणमस्तु.